स्वातंत्र्य सैनिक/त्यांचे नामनिर्देशित यांना शासकीय सेवेत वर्ग-3 व वर्ग-4 मधील पदांवर नोकरी देण्याबाबत वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशांचे एकत्रिकरण.

महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग,

शासन परिपत्रक क्रमांक सीएनएस-1087/499/के.नं.12/16-अ,

मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 4 मार्च 1991.

पहा :

(1) शासन परिपत्रक ज्ञापन, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक सीएनएस-1065/4652/जे, दिनांक 12 ऑक्टोबर 1965.

(2) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक सीएनएस-1075/381/475/16-अ, दिनांक 6 सप्टेंबर 1976.

(3) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक सीएनएस-1081/1/16-अ, दिनांक 2 मार्च 1981.

(4) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक सीएनएस-1080/1732/16-अ, दिनांक 30 जून 1982.

(5) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक सीएनएस-1084/सीआर-103/16-अ, दिनांक 10 जानेवारी 1985.

(6) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक सीएनएस-1082/3699/सीआर-28/85/16-अ, दिनांक 22 नोव्हेंबर 1985.

(7) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक सीएनएस-1087/0/सीआर-14/16-अ, दिनांक 13 मार्च 1987.

(8) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक सीएनएस-1087/2743/सीआर-41/16-अ, दिनांक 12 फेब्रुवारी 1988.

(9) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक सीएनएस-1089/1990/3462/सीआर-55/88/16-अ, दिनांक 30 नोव्हेंबर 1988.

(10) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक सीएनएस-1089/1990/सीआर-30/16-अ, दिनांक 20 सप्टेंबर 1989.

(11) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक प्रानिमं-2489/प्र.क्र.223/89/13-अ, दिनांक 20 फेब्रुवारी 1990.

(12) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक सीएनएस-1090/3497/सीआर-74/16-अ, दिनांक 22 जानेवारी 1991.

**शासन परिपत्रक :** स्वातंत्र्य सैनिकांना शासकीय सेवेत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील वर्ग-3 च्या पदावर तसेच वर्ग-4 मधील पदावर नियुक्तीसाठी शासनाने वर उल्लेखिलेल्या शासन निर्णयान्वये काही सवलती दिलेल्या आहेत. तदनंतर वेळोवेळी काही सवलती/सुधारणा/खुलासे करण्यात आले आहेत. त्यातील महत्त्वाच्या बाबींचा ह्या परिपत्रकाव्दारे पुनरुच्चार करण्यात येत असून खालीलप्रमाणे एकत्रित आदेश नियुक्ती अधिका-यांच्या माहिती व कार्यवाहीसाठी प्रसृत करण्यात येत आहेत.

**(1) स्वातंत्र्य सैनिकांसाठी नोकरीविषयक असलेल्या सवलती –**

(अ) स्वातंत्र्य सैनिकांना नोकरीसाठी नियुक्ती अधिका-यांकडे परस्पर अर्ज करता येईल. त्यांना सेवायोजन

केंद्र/प्रादेशिक दुय्यम निवड मंडळ यांच्यामार्फत येण्यापासून सूट देण्यात आली आहे.

(ब) वर्ग–3 व वर्ग–4 च्या पदावर नेमणुकीसाठी ते अन्यथा पात्र असतील तर नियुक्ती अधिका–यांनी त्या संपकालीन कर्मचा–यांना तर पसंतीक्रमाने नेमणूक द्यावयाची आहे.

(क) नेमणुकीसाठी असलेल्या अर्जाचा विचार करताना स्वातंत्र्य सैनिक जर शैक्षणिक पात्रतेची अट पूर्ण करी असेल व त्या पदावरील नेमणुकीसाठी अन्यथा पात्र ठरत असेल परंतु वयाधिक असेल तर त्याला त्या पदा नेमणुकीसाठी उच्च वयोमर्यादेत पाच वर्षे इतकी शिथिलता द्यावी. मागासवर्गीयांच्या बाबतीत त्यांना मिळत असलेल पाच वर्षे वयोमर्यादेव्यतिरिक्त ही सवलत लागू राहील.

(ड) स्वातंत्र्य सैनिक माध्यमिक शालांत परीक्षा (एस.एस.सी./पदवी परीक्षा किंवा पदविका पर्यन्त) शिकले आहेत परंतु त्या परीक्षेत उत्तीर्ण नसतील तर त्यांना वर्ग–3 मधील पदावर जेथे अशी शैक्षणिक अर्हता विहि केलेली आहे, नियुक्ती देता येईल, अशा प्रकरणी शैक्षणिक अर्हतेची अट शिथील केली आहे असे समजण्यात येईल

(2) नोकरीविषयक सवलतींचा लाभ घेण्यासाठी विहित केलेला पुरावा –

वरील सवलतींकरिता स्वातंत्र्य चळवळीच्या काळातील स्वातंत्र्य सैनिक म्हणजे ज्यांनी कमीत कमी एक म एकत्रित कालावधीचा तुरुंगवास किंवा स्थानबध्दता किंवा ज्यांना रुपये 100/– किंवा जास्त दंडाची शिक्षा झाली किंवा जे प्रत्यक्ष चळवळीत मृत्यू पावले किंवा हुतात्मा झाले (मारले गेले) किंवा स्थानबध्दतेत मृत्यू पावले, ज्य देहदंडाची सजा झाली किंवा गोळीबार, लाठीमार इत्यादी कारणांमुळे कायमचे जायबंदी झाले किंवा ज्यांचे उपजीविके साधन नष्ट झाले किंवा ज्यांची जंगम मालमत्ता पूर्ण वा काही अंशी नष्ट झाली, अशा व्यक्ती होत.

नोकरीविषयक सवलती प्राप्त करुन घेण्यासाठी संबंधित व्यक्तीने स्वातंत्र्य सैनिक म्हणून शासनाने (सामान्य प्रशा विभाग) दिलेले प्रमाणपत्र नियुक्ती अधिका–याकडे हजर केले पाहिजे. स्वातंत्र्य सैनिकाने सन्मानपत्र (सत्यप्रत) स केल्यास स्वातंत्र्य सैनिक म्हणून वेगळा पुरावा सादर करण्याची आवश्यकता नाही. स्वातंत्र्य सैनिकांना उपलब्ध असले सर्व नोकरीविषयक सवलती भूमिगत स्वातंत्र्य सैनिक तसेच आझाद हिंद (स्वातंत्र्य) सैनिक यांनाही उपलब्ध हो शकतील. मात्र शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक सीएनएस–1082/3699/सीआर–28/85/16–अ, दि 22 नोव्हेंबर 1985 अन्वये नियुक्ती अधिका–यांस ना–हरकत प्रमाणपत्र देण्यापूर्वी जिल्हाधिका–यांनी स्वातंत्र्य सैनिक किंवा भूमिगत स्वातंत्र्य सैनिकाचे मूळ सन्मानपत्र पडताळून पहाणे आवश्यक आहे.

(3) स्वातंत्र्य सैनिकांच्या नामनिर्देशितांसाठी सवलती –

स्वातंत्र्य सैनिकांसाठी असलेल्या सवलती वार्धक्यामुळे किंवा आजारपण इत्यादी कारणांमुळे स्वतः स्वातंत्र्य सैनि घेण्यास अपात्र असतील त्यावेळी ते त्यांच्यावर अवलंबित असलेल्या जवळच्या एका नातेवाईकास नोकरीविषय सवलतीचा फायदा घेण्यासाठी नामनिर्देशित करु शकतात. असे नामनिर्देशन केल्यानंतर नामनिर्देशित व्यक्ती स्वात सैनिकांसाठी असलेल्या सवलतीचा फायदा घेऊ शकतील.

(4) नामनिर्देशन कोणी करावे –

नामनिर्देशन मूलतः स्वातंत्र्य सैनिकाने करावयाचे आहे, परंतु जर स्वातंत्र्य सैनिक हुतात्मा झाला असेल वि नामनिर्देशन करण्यापूर्वी त्याचे निधन झाले असेल, त्या प्रकरणी अपवाद म्हणून त्यांच्या विधवा पत्नीस विहित केले व्याख्येतील जवळच्या अवलंबित नातेवाईकास नामनिर्देशित करण्याचा अधिकार राहील. तसेच पत्नी स्वातंत्र्य सैनिक अ ती हयात नसेल तर तिच्या विधूर पतीस असे नामनिर्देशन करण्याचा अधिकार राहील.

(5) नामनिर्देशन कोणाचे करता येईल –

स्वातंत्र्य सैनिकावर अवलंबून असलेल्या एका जवळच्या नातेवाईकास नामनिर्देशित करता येईल. जवळ नातेवाईकामध्ये पुढील नातेवाईकांचा समावेश असेल :–

स्वातंत्र्य सैनिकाची पत्नी, स्वातंत्र्य सैनिकाचा पती, मुलगा, अविवाहित किंवा घटस्फोटित मुलगी, सख्खा भाऊ, सख्खी अविवाहित किंवा घटस्फोटित बहीण, त्याचप्रमाणे सख्ख्या भावाचा किंवा बहिणीचा स्वातंत्र्य सैनिकावर अवलंबून असलेला मुलगा किंवा अविवाहित वा घटस्फोटित मुलगी, स्वातंत्र्य सैनिकाची सून (मुलाची पत्नी), विधवा मुलगी जिला सासरच्या नातेवाईकांकडून आधार नाही व जी स्वातंत्र्य सैनिकावर सर्वस्वी अवलंबून आहे.

(6) नामनिर्देशन व त्यासंबंधात कार्यपध्दती --

स्वातंत्र्य सैनिक व त्यांनी नामनिर्देशित यांना नोकरी देण्याचे अधिकार सर्व नियुक्ती अधिका--यांना/विभाग प्रमुखांना दिलेले आहेत. अशी नियुक्ती फक्त स्वातंत्र्य सैनिकांच्या एकाच नामनिर्देशित व्यक्तीस मिळू शकते. परंतु शासनामध्ये नोकरी मिळण्यासाठी एकापेक्षा अधिक व्यक्तींना नामनिर्देशित करण्यात आलेले नाही हे पडताळून पहाण्याच्या दृष्टीने नियुक्ती अधिका-यानी त्यांच्याकडे परस्पर आलेल्या अर्जावर विचार करताना नियुक्तीपूर्वी जिल्हाधिका--यांशी संपर्क साधून स्वातंत्र्य सैनिकाने एकापेक्षा अधिक नामनिर्देशितांना पुरस्कृत केलेले नाही याची खात्री करुन घ्यावी. याबाबत सर्व जिल्हाधिका--यांनी स्वातंत्र्य सैनिक व त्यांनी नामनिर्देशित केलेल्या व्यक्तींच्या नावांची यादी (नोंदवही वेळोवेळी उपलब्ध झालेल्या माहितीच्या आधारे) ठेवावी म्हणजे त्याबाबत पडताळणी करणे सोपे जाईल व अशा प्रकारचे "ना--हरकत प्रमाणपत्र" जिल्हाधिकारी संबंधित नियुक्ती अधिका--यांस देऊ शकतील.

स्वातंत्र्य सैनिकाने नामनिर्देशन करण्यासाठी पुढील कार्यपध्दती विहित करण्यात येत आहे. तसेच नामनिर्देशन पत्राचा नमुना सोबतच्या परिशिष्टात दर्शविल्याप्रमाणे आहे.

(1) स्वातंत्र्य सैनिकाचे नामनिर्देशनपत्र विहित नमुन्यात असावे. त्यामध्ये स्वातंत्र्य सैनिकाचे असे प्रतिज्ञापन असावे की, त्याने यापूर्वी कोणतेही नामनिर्देशन केलेले नाही आणि प्रतिज्ञापन खोटे आहे असे आढळून आल्यास, स्वातंत्र्य सैनिक खोटे प्रतिज्ञापन दिल्याच्या गुन्ह्यासाठी खटला भरण्यास पात्र राहील. स्वातंत्र्य सैनिकाने नामनिर्देशन पत्राच्या दोन प्रती जिल्हाधिकारी यांना द्याव्यात. पूर्वी नामनिर्देशन केलेले नाही ह्याची खात्री जिल्हाधिकारी यांनी करुन घेऊन नामनिर्देशन पत्राची नोंदणी करावी व नोंदणी क्रमांक व दिनांक देऊन एक प्रत स्वातंत्र्य सैनिकांस परत द्यावी.

(2) नेमणुकीचे आदेश निर्गमित करण्यापूर्वी नियुक्ती अधिका--याने स्वातंत्र्य सैनिक रहात असलेल्या जिल्ह्याच्या संबंधित जिल्हाधिका--याकडून खात्री करुन घ्यावी की, स्वातंत्र्य सैनिकाने पूर्वी नामनिर्देशन केलेले नाही.

(3) स्वातंत्र्य सैनिकाच्या पाल्याच्या नेमणुकीच्या आदेशात स्वातंत्र्य सैनिकाने केलेल्या नामनिर्देशन पत्राचा क्रमांक व दिनांक नमूद केलेला असावा. नेमणुकीच्या आदेशाची प्रत नियुक्ती अधिका--यांनी संबंधित जिल्हाधिकारी यांना पाठवावी.

(4) जिल्हाधिका--यांनी स्वातंत्र्य सैनिकांच्या नामनिर्देशितांची नोंद नोंदवहीत करताना ह्या विहित नमुन्यात नामनिर्देशनपत्र प्राप्त करुन घ्यावे. तसेच ह्यापूर्वी नामनिर्देशन केलेल्या परंतु अद्याप नेमणुकीसाठी विचार झालेला नाही अशा प्रकरणात सुध्दा ह्याच नमुन्यात नामनिर्देशनपत्र भरुन घ्यावे.

(7) सेवानिवृत्ति वेतनासाठी अर्हताकारी सेवा --

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक सीएनएस--1075/381/475/16--अ, दिनांक 6 सप्टेंबर 1976 अन्वये ज्या शासकीय कर्मचा--यांनी राष्ट्रीय चळवळीमध्ये भाग घेतला आणि शासन परिपत्रक, पोलिटिकल अँण्ड सर्व्हिसेस डिपार्टमेंट क्रमांक 2760/46, दिनांक 20 एप्रिल 1949 अन्वये (पहा परिशिष्ट--2) देण्यात आलेल्या वयाची अट शिथील करण्याच्या सवलतीचा लाभ घेऊन जे दिनांक 31 डिसेंबर 1951 पूर्वी शासकीय सेवेत रुजू झाले अशा कर्मचा--यांना सेवानिवृत्ती वेतनाकरिता (परंतु इतर कोणत्याही निवृत्ती वेतनाकरिता नाही) त्यांच्या एकूण सेवेच्या 4 था हिस्सा किंवा शासकीय सेवेतील नियुक्तीचे वेळी त्यांचे वय 25 वर्षापेक्षा जेवढ्या कालावधीने जास्त होते तेवढा कालावधी किंवा 5 वर्षांचा कालावधी, यांपैकी जो सर्वात कमी कालावधी असेल तेवढा कालावधी सेवा अर्हता निवृत्ती वेतनाकरिता सेवा कालावधी म्हणून जमेत धरण्याबाबत परवानगी आहे. अशीच सवलत दिनांक 31 डिसेंबर 1951 नंतर सेवेत प्रवेश केलेल्या व्यक्तींनाही अनुज्ञेय राहील.

एच--875(1200--9--98)2.

8. स्वातंत्र्य सैनिक/त्यांचे नामनिर्देशित (फक्त एक) यांना शासकीय सेवेत नोकरी देण्याबाबत त्यांच्या अर्जाचा सहानुभूतीने विचार करण्यात यावा. स्वातंत्र्य सैनिक/त्यांचे नामनिर्देशित यांस शासकीय सेवेत पसंतीक्रमाने नियुक्ती देतेवेळी निरनिराळ्या घटकांसाठी असलेल्या विहित आरक्षणांची टक्केवारी लक्षात घेऊन त्यानंतर स्वातंत्र्य सैनिकांचा नियुक्तीसाठी विचार व्हावा व शासकीय आदेशांचे काटेकोरपणे पालन व्हावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति

राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्र्यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्र्यांचे स्वीय सहाय्यक,
शासनाचे सर्व सचिव,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
संचालक, सेवायोजन, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा,
अध्यक्ष, स्वातंत्र्य सैनिक उच्चाधिकार समिती, मंत्रालय, मुंबई,
मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभाग/स्वातंत्र्य सैनिक कक्ष, कार्यासन क्रमांक 8, 12, 13-अ, 16-ब, 19, 19-अ, 20, 20-अ, 34,
निवड फाईल.

---

* पत्राने.

एच-875(1200-9-98)2-अ.

परिशिष्ट - I

नामनिर्देशन पत्र

शासन परिपत्रक ज्ञापन, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-सीएनएस-1065/4652/जे, दिनांक 12 ऑक्टोबर, 1965 आणि शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-सीएनएस-1081/1/16-अ, दिनांक 2 मार्च, 1981 मधील तरतुदीनुसार स्वातंत्र्य सैनिकाने त्याच्यावर अवलंबित अशा एका व्यक्तीला (जवळच्या एका नातेवाईकास) शासन सेवेत नेमणुकीबाबतच्या सवलतीसाठी करावयाचे नामनिर्देशनपत्र

---

मी, श्री./श्रीमती ------------------------------------------------------------ (स्वातंत्र्य सैनिक अथवा त्याची विधवा पत्नी यांचे संपूर्ण नाव), राहणार (पूर्ण पत्ता), मुक्काम ------------------ तहसील ------------------------ पोष्ट ------------------------ जिल्हा ------------------------ आज दिनांक ------------------------ रोजी असे प्रतिज्ञापूर्वक लिहून देतो की, शासनाने स्वातंत्र्य सैनिक अथवा त्यांच्यावर अवलंबून असलेल्या एका व्यक्तीस शासन सेवेत नोकरीसाठी ज्या सवलती विहित केलेल्या आहेत त्या सवलतींचा फायदा मी यापूर्वी स्वतः घेतलेला नाही. ही सवलत मी स्वतः वार्धक्यामुळे/आजारपणामुळे घेऊ शकत नसल्यामुळे तसेच सवलत घेण्यासाठी माझ्यावर पूर्णतः अवलंबून असलेली जवळची नातेवाईक व्यक्ती म्हणून मी, माझा/माझी ------------------------ (ह्या ठिकाणी खाली दर्शविलेल्या नात्यांपैकी एक नाते लिहावे.) श्री./श्रीमती/कुमारी ------------------------ वय ------------ त्याला/तिला नामनिर्देशित करीत आहे.

2. मी प्रतिज्ञापूर्वक स्पष्ट करतो की, असे कोणतेही नामनिर्देशन यापूर्वी मी केलेले नाही. आणि हे प्रतिज्ञापत्र खोटे आहे असे आढळून आल्यास खोटे प्रतिज्ञापत्र केल्याच्या गुन्ह्यासाठी मजवर खटला भरण्यात येईल याची मला जाणीव आहे.

सही.

( नाव )

स्थळ :-

दिनांक :-

साक्षांकन करणा-या जबाबदार व्यक्तीची सही, नाव व पदनाम.

प्रति,

जिल्हा अधिकारी ------------------------------------ यांना सादर.

(दोन प्रती)

जिल्हा अधिकारी कार्यालयातील नोंदणी क्रमांक व दिनांक :-

या प्रतिज्ञापत्राची नोंदवहीत नोंद घेण्यात आली.

---

जिल्हाधिकारी,

---

* 1) माझी पत्नी/माझा पती किंवा

2) माझा मुलगा किंवा अविवाहित/घटस्फोटित मुलगी किंवा

3) माझा सख्खा भाऊ किंवा माझी अविवाहित/घटस्फोटित बहिण किंवा

4) माझ्या सख्ख्या भावाचा किंवा बहिणीचा माझ्यावर अवलंबून असलेला मुलगा किंवा अविवाहित/घटस्फोटित मुलगी.

5) माझी सून (मुलाची पत्नी)

( वरील नात्यांपैकी कोणतीही एक व्यक्ती )

एच-875(1200-9-98)3

(कृ. मा. प.

*

1,

ज्या

त्या

ह्या

व

योजन

** साक्षांकन खालीलपैकी कोणत्याही एका जबाबदार व्यक्तीचे आवश्यक आहे.

1) केंद्र किंवा राज्य शासनाचे राजपत्रित अधिकारी
2) संसद सदस्य किंवा राज्य विधानमंडळ सदस्य
3) उप विभागीय दंडाधिकारी/अधिकारी
4) दंडाधिकारविषयक शक्ती प्रदान केलेले मामलेदार, तहसीलदार किंवा नायब/उप तहसीलदार
5) सर्व मान्यता प्राप्त महाविद्यालये आणि/किंवा माध्यमिक शाळांचे प्राचार्य आणि मुख्याध्यापक
6) पोस्टमास्तर
7) विशेष कार्यकारी दंडाधिकारी.

***********

एच-875(1200-9-98)3अ

परिशिष्ट - 2

Below copy of Government Resolution, General Administration Department No. CNS-1075/381/475/XVI, dated 6th September, 1976 regarding Government Servants who took part in National Movements Grant of additional qualifying service to certain categories.

*******

RESOLUTION :- By Government Circular No.2760/46, dated the 15th November, 1948 and 20th April, 1949 (extracts enclosed), certain concessions were granted in the matter of entry into Government service to persons who took part in the National Movements and were thereby prevented from availing themselves of the normal opportunities for entry into Government service. The question of giving further benefits to those Government servants who have suffered on account of their political activities before independence, in so far as their qualifying service for pension purposes is concerned has been examined by Government. Government is now pleased to direct that Government servants who had participated in the national movements and who entered Government service on or before the 31st December, 1951 by availing themselves of the concession of relaxation of age in terms of Government Circular, Political and Services Department, No.2760/46, dated the 20th April, 1949 should be allowed to add to their service qualifying for superannuation pension (but not for any other class of pension) the actual period not exceeding one-fourth of the length of their service or the actual period by which their age at the time of recruitment exceeded 25 years, or a period of five years whichever is the least.

This Government Resolution issues with the concurrence of the Finance Department vide its u.o.r. No.1658/76/SER-4, dated the 4th September, 1976.

Accompaniment to G.R., G.A.D., No.CNS-1075/381/475/XVI, dated 6.9.76.

Government Circular Political and Services Department No.2760/46, dated 15th November, 1948.

Government has decided that the recruit authorities should also consider applications for employment from persons who had to give up their collage or school studies on account of participation in the Civil Disobedience Movement on merits notwithstanding their lack of the educational qualifications prescribed for any particular service or post and recommend their cases to Government for relaxation of the prescribed educational

qualifications, if they are otherwise capable of being selected on merits, provided:-

(i) they establish satisfactorily the fact of their participation in the Civil Disobedience Movement, and

(ii) the participation has resulted in their not obtaining the prescribed qualifications.

Government Circular, Political and Services Department No.2760/46, dated 20th April, 1949.

Persons who claim the benefits of the concessions in the proceeding paragraph should submit alongwith their applications as certificate from the District Magistrate of the District in which they participated in the Civil Disobedience Movement or of the Commissioner of Police, Bombay, if the participation was in Greater Bombay confirming their claims:-

(i) that they participated in the Civil Disobedience Movement, and

(ii) that their participation has resulted in their not obtaining the prescribed qualifications.

The District Magistrates and the Commissioner of Police, Bombay, should verify the claim of the persons carefully and issue the certificates only if they are fully satisfied as to the genuineness of the claims.

It has been accepted as a general policy that those who had suffered imprisonment or detention in connection with the national struggle should be permitted to deduct from their age the period of their imprisonment or detention for the purpose of computing their age with reference to the age limits prescribed for the various posts under the State Government. This concession is not, however, given as a matter of course but each case is considered on merits.

*******

एच-875(1200-9-98)4अ